**तहसिलदार संवर्गातील अधिका-यांची पदस्थापना**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र.बदली-२०२५/प्र.क्र.१०७/ई-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १७ एप्रिल, २०२५

**संदर्भ**:- कार्यालयीन आदेश, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मुमंस-१०२४/प्र.क्र.१(भाग-४)/मंआस्था, दि.०७.०१.२०२५.

**शासन आदेश:-**

संदर्भाधीन आदेशान्वये, श्री.उल्हास देवरे, तहसिलदार पारोळा, जि.जळगांव यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती मा.मुख्यमंत्री कार्यालयात कार्यक्रम अधिकारी या पदावर करण्यात आलेली होती. सदरहू आदेशानुसार श्री. उल्हास देवरे हे सदर पदावर दि.०१.०१.२०२५ पासून कार्यरत होते. तथापि, श्री.उल्हास देवरे यांनी कौटुंबिक कारणास्तव सदरहू प्रतिनियुक्तीच्या पदावरून कार्यमुक्त करण्याबाबत केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने मा.मुख्यमंत्री कार्यालयाने दि.०८.०४.२०२५ च्या पत्रान्वये श्री.उल्हास देवरे यांची कार्यक्रम अधिकारी या पदावरील प्रतिनियुक्ती रद्द करून त्यांना दि.०८.०४.२०२५ पासून कार्यमुक्त केलेले आहे. त्यामुळे ते सध्या नियुक्तीच्या प्रतिक्षेत आहेत.

२. सबब, श्री.उल्हास देवरे,तहसिलदार यांची पदस्थापना खालील तक्त्यातील स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्तव सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने करण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याची पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.उल्हास देवरे,तहसिलदार | नियुक्तीच्या प्रतिक्षेत | तहसिलदार पारोळा, जि.जळगांव |

३. सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून उपरोक्त नमूद अधिकारी यांनी स्तंभ क्र.४ मधील नमूद पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे. संबंधीत अधिकारी त्यांना देण्यात आलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत e3.revenue@maharashtra.gov.in या ईमेलद्वारे / टपालाद्वारे शासनास त्वरीत कळवावे.

४. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत

संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन"*(dies non)* म्हणून गणला जाईल**, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

६. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक ) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामूळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२५०४१७१७४२१५९६१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=d36a0a6455652c60ea76104dd537113a9ca67ab14a315b9cefc36fc9be2915f8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2025.04.17 17:43:10 +05'30'

**(अजित देशमुख)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

विभागीय आयुक्त, नाशिक.

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (नगरविकास) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
- संबंधित जिल्हाधिकारी.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित तहसिलदार (संबंधित विभागीय आयुक्त यांचेमार्फत).
- सह सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-३).